॥ श्रीः ॥

# श्रीमहाभारतसारः

## तृतीयः खण्डः

## शान्ति-अनुशासन-आश्वमेधिक-आश्रमवासिक -मौसल-महाप्रस्थानिक-स्वर्गारोहणपर्वात्मकः


सम्पादक-मण्डलम्

१ पण्डित—वासुदेव गगाधर जोशी, मातापुरम् (माहूर)

२ पण्डित—रेणुकादास राजेश्वर अयाचित, औदुम्बरक्षेत्रम् (उम्बरखेड)

३ डॉक्टर—य. खु देशपाडे, एम् ए , एल्एल् बी., डी लिट् ,
यवतमालम् (यवतमाळ)

४ प्रा —श्री भा वर्णेकर, एम् ए , बी टी , नागपुरम्

५ पण्डित—वा स पेण्ढरकर, बी ए , अमरावती



मिति मार्गशीर्ष शु॥ ११
(गीताजयती)
शके १८७८ शुक्रवासर
दि. १४-१२ १९५६

प्रथमं संस्करणम्
११००

मूल्यम्
८ रूप्यकाः

# प्रस्तावना

यथा समुद्रो भगवान् यथा मेरुर्महागिरि ।
उभौ ख्यातौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥

महाभारतसार, खंड १, आदिपर्व, पृष्ठ २३, श्लो. २६४-२६५.

'श्रीमहाभारतसारा'च्या मागील खडाच्या प्रस्तावनेत महाभारतविषयक अनेक विषयाचा उहापोह येऊन गेला आहे त्याची पुनरुक्ति करण्याची जरूरी नाही पण इतर काही प्रश्नाविषयी माहिती आलेली नाही त्याची चर्चा येथे करण्याचा विचार आहे

रामायण व महाभारत ही आपली दोन आर्ष महाकाव्ये होत त्यापैकी रामायणाचा उल्लेख बहुधा ' आदिकाव्य ' असा करण्यात येतो, व त्याचें प्राचीनत्व व त्यातील काव्यगुण लक्षात घेता तें अभिधान योग्य आहे यात सशय नाही याच्या उलट महाभारत हा मुख्यत इतिहासग्रथ आहे त्यात काव्यदृष्ट्या उत्कृष्ट भाग आहेत यात संशय नाही पण त्याचे महत्त्व मुख्यत इतिहासग्रथ म्हणून आहे खुद्द महाभारतातहि त्याला ' इतिहासोत्तम ' असे म्हटले आहे

इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धय ।
पञ्चभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रय ॥

श्रीमहाभारतसार, प्रथम खण्ड, आदिपर्व, श्लोक २३

' पञ्चमहाभूतापासून स्वर्ग, मृत्यु व पाताल या तीन लोकाची उत्पत्ति झाली, त्याप्रमाणें या महाभारत नामक उत्कृष्ट इतिहासग्रथापासून अनेक कवीना स्फूर्ति मिळत आहे ' असे आदिपर्वांत ( म भा सा. ख १, श्लोक २३, आदिपर्व पृ ३ ) म्हटले आहे त्यात यत्किंचितहि अतिशयोक्ति नाही.

महाभारतात कौरव-पाडवामध्यें झालेल्या अत्यत भीषण युद्धाचा इतिहास आहे हें युद्ध खरोखरच झाले किंवा नाही, झाले असल्यास तें केव्हा झाले, त्यात ज्यानी भाग घेतला त्या व्यक्ति ऐतिहासिक होत्या किवा

केवळ काल्पनिक होत्या, या युद्धाचे वर्णन प्रथमत केव्हा लिहिले गेले, नंतर त्यात कसकशी भर पडली, साम्प्रतच्या महाभारताचा काल कोणता इत्यादि प्रश्नाचा खोल विचार जिज्ञासाबुद्धीनें अनेक परदेशीय व भारतीय विद्वानानी केला आहे त्याविषयी थोडीशी माहिती येथे देऊ

महाभारत हा भरतवशातील कौरव व पाडव याच्यामध्ये झालेल्या महायुद्धाच्या वर्णनाचा ग्रथ आहे साम्प्रदायिक मताप्रमाणे हें युद्ध द्वापर युगाच्या अखेरीस झाले, व ते सपल्याबरोबर कलियुगाचा किंवा युधिष्ठिर सवताचा आरभ झाला हा संवत् खिस्तपूर्व ३१०१ या वर्षी सुरू झाला असे प्रचलित मत आहे तथापि या सवताचा उल्लेख खिस्तोत्तर सातव्या शतकापर्यंत कोरीव लेखात आढळत नाही वराहमिहिराच्या मताप्रमाणे शककालात २५२६ मिळविल्यावर जे वर्ष येते त्या वर्षी म्हणजे खिस्तपूर्व २६०४ या वर्षी युधिष्ठिर गादीवर बसला लो टिळकाना भारतीय युद्ध खिस्तपूर्व १४०० च्या वर्षीं झाले, हें मत मान्य होते असे दिसते याप्रमाणे भारतीय युद्धाच्या कालाविषयी विविध मते आहेत काहीच्या मते तर असे एखादे युद्ध प्राचीन काळी झालेच नसावे, कारण त्याचा किंवा त्यात भाग घेणाऱ्या प्रमुख व्यक्ति दुर्योधन, दु शासन, कर्ण, भीम, अर्जुन इत्यादिकाचा प्राचीन वैदिक वाङ्मयांत उल्लेख येत नाही पण हे प्रमाण अभावात्मक आहे असा उल्लेख एखाद्या वैदिक ग्रथात आला पाहिजे होता, असे दाखविल्याखेरीज त्याला महत्त्व नाही महाभारतातील व्यक्तीची नावे प्राचीन वाङ्मयात अगदीच येत नाहीत असे नाही उदाहरणार्थ अथर्ववेदाच्या कुन्तापसूक्तात ( १२७, ७-१० ) परिक्षिताच्या राजवटीचे वर्णन आले आहे त्यांतील दोन मंत्र येणेप्रमाणे—

कतरत्त आ हराणि दधि मन्था परि श्रुतम् ।
जाया पति वि पृच्छति राष्ट्रे राज्ञ परिक्षित ॥
अभीवस्व प्र जिहीते यव पक्व पथो बिलम् ।
जन स भद्रमेधति राष्ट्रे राज्ञ परिक्षित. ॥

परिक्षित् राजाच्या राष्ट्रात पत्नी पतीला विचारते—मी आपणास काय वाढू ? दही, घुसळलेलें ताक (?) किंवा दूध ?

शिजलेले यव प्रकाशाप्रमाणे भाड्यांतून बाहेर साडत आहेत परिक्षित् राजाच्या राष्ट्रामध्ये लोक कल्याणकारक समृद्धि प्राप्त करून घेतात

ब्राह्मण ग्रथात परिक्षिताचा पुत्र जनमेजय आणि दुष्यत व शकुतला याचा पुत्र भरत याची नावे येतात काठक संहितेत विचित्रवीर्यांचा पुत्र धृतराष्ट्र याचा उल्लेख आहे तेव्हा भारतीय युद्धातील कांही व्यक्ति व त्याचे वशज याची नावे वैदिक वाङ्मयात आढळतात यात संशय नाही शाखायन-श्रौतसूत्रात कुरुक्षेत्रातील युद्धात कौरवाचा पूर्ण पराजय झाल्याचे वर्णन आहे पाणिनीच्या अष्टाध्यायीत युधिष्ठिर, भीम व विदुर या नांवाच्या व्युत्पत्तीचे नियम दिले आहेत तेव्हा भारतीय युद्धाच्या काळातील या व्यक्ति पूर्णपणे ऐतिहासिक आहेत व महाभारतात वर्णिल्याप्रमाणे अगदी ततोतत नसले तरी कौरव-पाडवांच्या युद्धासारखे युद्ध प्राचीन काळी, बहुधा वेदकाळाच्या अखेरीस, होऊन गेले असावे असे मानण्यास हरकत नाही

कोरव-पाडवाच्या या भीषण युद्धाचे वर्णन त्याच कालात कृष्णद्वैपायन व्यासाने करून ते आपल्या पाच शिष्यास पढविले, असे महाभारतावरून समजते या ग्रथाचे नाव 'जय' असे होतें, (**जयनामेतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीषुणा ।** आदिपर्व, अ ६२, श्लो २० ) आणि तें नाव सार्थ होते कारण त्यात पाडवानी कौरवावर युद्धात जो जय मिळविला त्याचे वर्णन होते अशा प्रकारची युद्धाची वर्णने करण्याचा प्रघात वेदकाळी होता हें ऋग्वेदाच्या सातव्या मंडळातील अठराव्या सूक्तावरून स्पष्ट दिसते त्या सूक्तात दिवोदासाचा पुत्र सुदास याने दहा राजावर मिळविलेल्या विजयाचे सुदर वर्णन आहे हे 'दाशराज्ञ' युद्ध ऋग्वेदकाळी फार गाजले होते, हे त्या मडळातील त्याच्या अनेक उल्लेखावरून दिसते अशा तऱ्हेच्या ऐतिहासिक घटना, राजवश वगैरेचें वर्णन ज्या वाङ्मयात केले असे, त्याला 'इतिहास' अशी संज्ञा होती शतपथ ब्राह्मणात इतिहास व पुराण याना वेद म्हटलें आहे छादोग्य उपनिषदातहि इतिहासपुराणाला पाचवा वेद म्हटले आहे त्यावरून त्याला किती महत्त्व दिले जात असे, हें स्पष्ट होईल किंबहुना, वेदाचा अर्थ लावण्याच्या जशा याज्ञिक, नैरुक्त इत्यादिकाच्या पद्धति होत्या तशी ऐतिहासिकाचीहि एक स्वतत्र पद्धत होती ऋग्वेदात

इद्रवृत्रयुद्ध इत्यादिकाचे जे वर्णन आहे तें रूपकात्मक नसून त्या तऱ्हेच्या घटना खरोखरीच घडल्या असे ऐतिहासिकाचे मत होतें या ऐतिहासिकाच्या मताचा उल्लेख यास्काचार्यांच्या निरुक्तात काही ठिकाणी आला आहे. याशिवाय 'नाराशसी गाथा' नामक प्रशसात्मक काव्याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात आला आहे. या सर्व उल्लेखावरून ऐतिहासिक स्वरूपाचे बरेचसें वाङ्मय वेदकाली निर्माण झाले होते याविषयी संशय नाही तेव्हा कौरव पाडवाच्या युद्धाचें वर्णन असलेला जय नामक ग्रथ प्राचीन काळी रचला असणे अत्यत सभवनीय आहे हा ग्रथ आपल्या महाभारताचे मूळ रूप होय

'जय' नामक ग्रथाचा आकार केवढा होता हें समजण्यास आज साधन नाही आदिपर्वांत एके ठिकाणी आठ हजार आठशे अशी श्लोक-सख्या आली आहे ती 'जय' ग्रथाची असावी असें काहीचे मत आहे, पण ती सख्या कूटश्लोकाची आहे हे खालील श्लोकावरून दिसून येईल व्यास म्हणतात—

अष्टौ श्लोकसहस्राणि अष्टौ श्लोकशतानि च ।
अह वेद्मि शुको वेत्ति सञ्जयो वेत्ति वा न वा ॥

आदिपर्व, अध्याय १, श्लो ८१

'या ग्रथातील आठ हजार आठशे श्लोकाचा अर्थ मला माहीत आहे. माझा पुत्र शुक याला माहीत आहे, पण संजयाला माहीत असेल किवा नसेलहि'

ह्या ग्रथाला हजारो वर्षांचा कालावधि झाल्यामुळें त्याचे मूळ स्वरूप आतां अगदी बदलून गेले असले पाहिजे म्हणून तो सध्याच्या महा-भारतातील अमुकच भाग असे सागणें अशक्य आहे वैदिक भाषेत आणि सध्याच्या महाभारताच्या भाषेंत महदतर आहे त्यामुळे व्यासरचित जयग्रथ आता मूळच्या स्वरूपात राहिला नाही हे उघड आहे.

युद्धवर्णनपर काव्ये प्राचीन काळी सूत किवा भाट राजदरबारात किवा रणभूमीवर योद्धयाना प्रोत्साहन देण्याकरिता गात असत. ही पद्धति

अगदी अलीकडील कालापर्यंत प्रचलित होती. मध्यप्रदेशाच्या जबलपुर जिल्ह्यातील 'कारीतलाई' येथे खिस्तोत्तर दहाव्या शतकात होऊन गेलेल्या सोमेश्वरभट्ट नामक मन्याचा शिलालेख सांपडला आहे, त्यात त्याच्या स्तुतिपर खालील श्लोक आहे—

शस्तं यद्यज्ञभूमौ रणशिरसि सदा शसित होतृसूतै-
र्गीत षड्जादिभेदैरतिमधुरगिरोद्गातृभिर्गाथकैश्च ।
अध्वर्यु कर्मवर्यं प्रचरति च करी दानसंसिक्तहस्त-
स्तस्य श्रीभट्टसोमेश्वरगुणगणने के वय तुच्छवाच ॥

यामध्ये सोमेश्वराच्या यज्ञभूमीत होता जशी सूक्तें म्हणत असे तशी सूतहि रणागणावर त्याची स्तुतिस्तोत्रे गात असे, असें म्हटले आहे रजपुताच्या दरबारी भाटानी आणि छत्रपति शिवाजी महाराजाच्या राजसभेत शाहीरानी आपली कवने गाऊन योद्धयाची वीरश्री जागृत केल्याची उदाहरणे इतिहासज्ञास परिचित आहेत व्यासाचा 'जय' ग्रथहि असाच प्राचीन काळच्या सूतानी मुखोद्गत करून राजसभात म्हटला असला तर त्यात आश्चर्य नाही हा ग्रंथ लेखनिविष्ट न होता सूताच्या तोडी दीर्घ काळ राहिल्यामुळे त्यामध्यें अनेक पाठभेद व भेसळ झाली असावी महाभारताच्या अनेक पोथ्या हिंदुस्थानच्या भिन्न भिन्न प्रदेशातून जमवून त्याचा अभ्यास केल्यावर त्यातील परस्परभेदाचे व विविध पाठाचे एक मुख्य कारण महाभारत हा ग्रथ दीर्घकाळ लेखनिविष्ट न होता सूतादिकाच्या तोंडी राहिला हें असावे, असे महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे संपादक डॉ सुखटणकर यानी म्हटले आहे

यानतर 'जय' ग्रथाचा विस्तार बराच वाढून त्याला 'भारत' अशी सज्ञा प्राप्त झाली. याच्या विस्तारासंबंधी महाभारतातच पुढील श्लोक आला आहे—

चतुर्विंशतिसाहस्त्री चक्रे भारतसहिताम् ।
उपाख्यानैर्विना तावत् भारत प्रोच्यते बुधै ॥

या श्लोकात भारत-ग्रथाची श्लोकसख्या चोवीस हजार होती असे सागितले आहे सध्याच्या महाभारतातील उपाख्याने वगळल्यास ही श्लोकसंख्या येते असेंहि यात म्हटले आहे पूर्वी या ग्रथाचे नाव 'जय' होते ते आता 'भारत' झाले यावरून आता त्यामध्ये दाशराज्ञयुद्ध-वर्णनपर सूक्तातल्याप्रमाणें केवळ कौरव पाडवाच्या युद्धाचेच वर्णन नसून भरतकुलोत्पन्न कौरव व पाडव याच्या जन्मापासूनचा–कदाचित् त्याच्या पूर्वीच्या काही पिढ्याचाहि–इतिहास, तसेंच युद्धानतरचा पाडवाचा इतिहास आला असावा. या 'भारत' ग्रथाचा आरभ कोणत्या प्रकरणा-पासून झाला असावा याविषयी महाभारतात स्पष्ट विधान नसले तरी अनुमान करण्यास जागा आहे

मन्वादि भारतं केचिदास्तिकादि तथापरे।
तथोपरिचरादन्ये विप्रा सम्यगधीयते ॥

या श्लोकात 'महाभारत' ग्रथाचे तीन आरभ सागितले आहेत **'नारायण नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्। देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत्॥'** हा 'मनु' किवा श्लोक सध्या महाभारताच्या आरंभी आहे यामध्ये 'जय' नामक ग्रथाचा उल्लेख असल्याने हा पूर्वी त्या ग्रथाच्या आरभी असावा पुढें त्या ग्रथाला महाभारताचे विशाल रूप प्राप्त झाल्यावर तो श्लोक तेथून काढून महाभारताच्या आरभी घालण्यात आला असे दिसतें व तो अद्यापि तेथेंच मगलश्लोकरूपानें आहे दुसरा म्हणजे 'भारत' ग्रथाचा आरभ उपरिचर वसूच्या आख्यानानें झालेला दिसतो हे आख्यान सध्याच्या महाभारताच्या आदिपर्वाच्या ६३ व्या अध्याया-पासून सुरू होते आदिपर्वाच्या आरभी जसे महाभारतस्तुतिपर श्लोक आहेत तसे या आख्यानाच्या पूर्वीच्या ६२ व्या अध्यायात आढळतात. त्यावरूनहि तेथें एके काळी ग्रथाचा आरभ होत होता हे उघड आहे हे भारत व्यासशिष्य वैशपायनाने परिक्षिताचा पुत्र राजा जनमेजय यास सर्पसत्राच्या प्रसंगी सागितले, असें महाभारतात म्हटले आहे

वैशंपायनाच्या 'भारता'त उपाख्याने नव्हती असें मागे उद्धृत केलेल्या श्लोकात म्हटलें आहे सध्याच्या महाभारतात प्रविष्ट झालेली

नल-दमयन्ती, सत्यवान्-सावित्री वगैरेची उपाख्यानें त्या वेळी कदाचित् भारतात घातली गेली नसतील, पण भारतीय कथेशी सबद्ध अशी दुष्यन्त-शकुन्तला, ययाति वगैरेचा आख्याने त्यात अन्तर्भूत केली असावी अशी अनेक आख्यानें वैदिककाळी निर्माण झाली होती ही आख्याने यज्ञप्रसंगी म्हणण्याचा प्रघात होता त्यापैकी पुरुरवस्-उर्वशी, यम-यमी इत्यादि आख्यानासंबधी सूक्ते रचलेली ऋग्वेदात आढळतात इतर काही सुपर्णाख्यानासारखी आख्याने अद्यापि उपलब्ध आहेत त्यावरून त्याचे तत्कालीन स्वरूप अजमावता येते वार्त्तिककार कात्यायनाच्या काळी अशी अनेक आख्याने व आख्यायिका प्रचलित होत्या त्याचे अध्ययन करून विवरण करणाऱ्याना त्या त्या आख्यानादिकावरून विशिष्ट नावे पडत असे ‘ आख्यानाख्यायिकेतिहासपुराणेभ्यश्च ’ या पाणिनिसूत्र, ४, २, ६० यावरील वार्त्तिकावरून दिसते या वार्त्तिकावरील भाष्यात पतजलीने ‘ यवक्रीत ’, ‘ प्रियङ्गु ’ व ‘ ययाति ’ या आख्यानाचा उल्लेख केला आहे यवक्रीत व ययाति याची आख्याने महाभारताच्या अनुक्रमे वनपर्वात (अ १३५–१३८ ) व आदिपर्वात (अ ७६-८५ ) आली आहेत पतजलीच्या काळी महाभारताला सध्याचे स्वरूप प्राप्त झाले होते यात संशय नाही तथापि त्या काळीहि ही आख्याने स्वतन्त्रपणें म्हटली जात व त्याचा अभ्यास करणाऱ्याना ‘ यावक्रीतिक ’, ‘ यायातिक ’ अशा विशिष्ट नावे असत, ही गोष्ट उल्लेखनीय आहे

महाभारताची तिसरी आवृत्ति सौति उग्रश्रवा याने तयार केली जनमेजयाच्या सर्पसत्राच्या प्रसंगी लोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा उपस्थित होता त्या ठिकाणी वैशपायनाने सागितलेल्या भारतकथा ऐकल्यावर अनेक तीर्थांच्या ठिकाणी जाऊन उग्रश्रवा नैमिषारण्यात शौनकाच्या बारा वर्षे चाललेल्या सत्रात आला आणि तेथे त्याने ऋषीना महाभारत सागितले अशी कथा आदिपर्वाच्या पहिल्या अध्यायात आली आहे मागे उद्धृत केलेल्या श्लोकात भारताचा एक आरभ आस्तिकाख्यानाने होतो असे म्हटले आहे ते या महाभारतास अनुलक्षून असावे कारण आदिपर्वाच्या आरभी

( अ १३–५८ ) आस्तीकपर्व आले आहे त्यातील कथा बहुतांशी वैदिक सुपर्णाख्यानासारखी आहे

या तृतीय सस्करणात प्रस्तुत ग्रथाचा खूपच विस्तार वाढून त्याला सध्याचे शतसाहस्री संहितेचे किंवा एकलक्षश्लोकात्मक ग्रथाचे स्वरूप प्राप्त झाले, असे दिसते या सस्करणाच्या वेळी अनेक आख्याने, उपाख्याने, तीर्थांची वर्णने, राज्यशास्त्र, नीतिशास्त्र वगैरेची चर्चा, शिव, विष्णु इत्यादि पौराणिक देवताच्या स्तुति व कथा, त्या काळी जनसमत होऊ लागलेल्या निवृत्तिमार्गाच्या किंवा सन्यासधर्माच्या कथा, इत्यादिकाना या ग्रथात स्थान मिळून त्याला सर्वसंग्राहक स्वरूप प्राप्त झाले. तसेच कृष्णचरित्रपर हरिवश नामक परिशिष्टहि त्याला जोडण्यात आले

परपरागत कथेनुसार महाभारताला प्रस्तुत स्वरूप व्यासानतर एक दोन पिढ्यातच प्राप्त झाले असे म्हणावे लागेल पण त्या ग्रथाच्या विस्तारावरून, तसेच त्याची भाषा, त्यातील कथा, वर्णन व चर्चा यावरून तो ग्रथ शेकडो वर्षांच्या कालावधीनतर सध्याच्या रूपास प्राप्त झाला असे दिसतें. महाभारत ग्रथाच्या सध्याच्या स्वरूपाची उत्तर मर्यादा अद्यापि अनिश्चित आहे तथापि आश्वलायन गृह्यसूत्रातील ‘ सुमन्तुजैमिनिवैशपायनपैलसूत्र-भाष्यभारतमहाभारतधर्माचार्या तृप्यन्तु ’ इत्यादि तर्पणसूत्रावरून ती मर्यादा गृह्यसूत्राच्या काळाच्या ( सुमारे खिस्तपूर्व पाचव्या–सहाव्या शतकाच्या ) अलीकडे येत नाही हे निश्चित या काळानतरहि महाभारतात काही भाग प्रक्षिप्त झाला असावा कारण त्यात काही ठिकाणी शक, यवन, पह्लव या परकी लोकाचा उल्लेख आहे या लोकाच्या हिंदुस्थानावरील स्वाऱ्या खिस्तपूर्व चौथ्या शतकापासून खिस्तोत्तर पहिल्या–दुसऱ्या शतका-पर्यंत चालू होत्या तेव्हा त्याचा ज्यामध्ये उल्लेख आहे असे श्लोक फार प्राचीन असू शकत नाहीत पण एकदरीत असा भाग थोडा आहे

‘ जय ’ ग्रथाच्या कालापासून आतापर्यंत लोटलेल्या हजारो वर्षांच्या अवधीत व्यासाच्या मूळ ग्रथाच्या स्वरूपात जो फरक झाला त्याची यथार्थ कल्पनाहि करणे दुर्घट आहे इतकेच काय, पण सौतीच्या तृतीय संस्करणाच्या वेळीहि ‘ महाभारत ’ ग्रंथाला जे स्वरूप प्राप्त झाले त्याचे आता पूर्णपणे

आकलन करणे कठीण आहे खडप्राय भारत देशात दीर्घकाळ सूताच्या तोंडी राहिल्यामुळे, अनेक कवींनी वेळोवेळी त्यांत भर घातल्यामुळे आणि हजारो लेखकांनी त्याच्या प्रती करताना केलेल्या प्रमादामुळे भिन्न भिन्न प्रदेशात सध्यां उपलब्ध होणाऱ्या महाभारताच्या पोथ्यात इतके फरक आढळतात की त्यावरून या शतसाहस्री संहितेची मूळ प्रत निश्चितपणें व समाधानकारक रीतीने तयार करणे हे सध्याच्या टीकाशास्त्राच्या आवाक्याबाहेरचें आहे, असे उद्गार भांडारकर प्राच्य मंदिराने हाती घेतलेल्या महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे संपादक डॉ सुखटणकर यांनी काढले आहेत आदि-पर्वांतील पर्वसंग्रहपर्वांत भिन्न भिन्न पर्वांतील श्लोकसंख्या दिली आहे ती प्रमाण मानावी तर त्या श्लोकसंख्येचेहि भिन्न भिन्न पाठ उत्तर व दक्षिण भारतांत प्रचलित आहेत. तेव्हा पोथ्यांच्या उपलब्ध पुराव्यावरून महा-भारताचे केवळ जास्तीत जास्त जुने स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न भांडारकर-प्राच्य-मंदिराच्या आवृत्तीत करण्यात येत आहे अशा परिस्थितीत सामान्य वाचकाच्या सोईच्या दृष्टीनें महाभारताचें सार काढून प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशकांनी केला तर त्यात आक्षेपार्ह असे कांही नाही

या प्रस्तावनेत आरंभी उद्धृत केलेल्या ‘ **इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धय.** ’ इत्यादि श्लोकात महाभारतापासून कवींना स्फूर्ति मिळते असे म्हटले आहे भारतीय वाङ्मयाचे विहंगमावलोकन केल्यास यात मुळींच अतिशयोक्ति आढळणार नाही ख्रिस्तपूर्व दोन तीन शतकांपासून आजतागायत अनेक संस्कृत, प्राकृत व देशी भाषांतील कवि, नाटककार व गद्यलेखक यांनी महाभारतातील कथानके घेऊन आपले ग्रंथ रचले आहेत. त्या सर्वांचा परामर्ष येथे घेणे शक्य नाही पण काही प्रमुख संस्कृत ग्रंथकार व त्यांचे ग्रंथ यांचा निर्देश करता येईल

पतंजलीच्या महाभाष्यात ( ख्रिस्तपूर्व द्वितीय शतक ) ‘ कंसवध ’ व ‘ बलिबंध ’ या दोन नाटकाच्या रंगभूमीवरच्या प्रयोगांचा उल्लेख आहे ही सर्वांत प्राचीन ज्ञात संस्कृत नाटके होत त्यांचे विषय अनुक्रमें ‘हरिवंश’ व ‘महाभारत’ यातून घेतले आहेत. यानंतर ख्रिस्तोत्तर दुसऱ्या तिसऱ्या

शतकात होऊन गेलेल्या भासाने तर सबध महाभारतालाच नाट्यरूप दिले होते असे दिसते महाभारतातील भिन्न भिन्न प्रसगावर रचलेली त्याची 'म यमव्यायोग', 'पचरात्र', 'दूतघटोत्कच', 'कर्णभार' व 'ऊरुभग' अशा पाच नाटके सध्या उपलब्ध झाली आहेत याशिवाय त्याचें 'बाल-चरित' नाटक हरिवशावर आधारलेले असून त्यात कृष्णजन्मापासून कस-वधापर्यंत कथा आली आहे यानतरचा सुप्रसिद्ध नाटककार कालिदास याच्या 'विक्रमोर्वशीय' व 'शाकुतल' या नाटकाची कथानके हरिवशातील व महाभारतातील उपाख्यानावरून घेतली आहेत यापुढील खिस्तोत्तर आठव्या शतकातल्या भट्टनारायणाच्या 'वेणीसहार' नाटकाचा तर सबध भारतीय युद्धच विषय झाला आहे. याशिवाय 'प्रतिमानिरुद्ध' 'पाडवानन्द' इत्यादि काही महाभारत हरिवश-विषयक नाटकाचा उल्लेख अभिनव-गुप्ताच्या 'ध्वन्यालोकलोचना'त आला आहे राजशेखराने आपल्या 'बाल-भारत' नाटकात द्रौपदीस्वयवरापासून आरभ करून सबंध भारतकथेला नाट्यरूप देण्याचा उपक्रम केला होता, पण ते नाटक अपूर्णच राहिलेले दिसते यानतर क्षेमेंद्राचे 'चित्रभारत', हेमचद्राचे 'निर्भयभीम', कुल-शेखराचें 'सुभद्राधनजय', रविवर्म्याचे 'प्रद्युम्नाभ्युदय', प्रह्लाददेवाचे 'पार्थपराक्रम', विजयपालाचे 'द्रौपदीस्वयवर', विश्वनाथाचे 'सौगन्धिका-हरण', रामचद्राचे 'यादवाभ्युदय' रामवर्म्याचे 'रुक्मिणीपरिणय', शेष-चिन्तामणीचें 'रुक्मिणीहरण', शेषकृष्णाचे 'कसवध' इत्यादि अनेक नाटके पाडवाच्या आणि कृष्णाच्या चरित्रातील विविध प्रसगावर रचली होती

काव्याच्या क्षेत्रात महाभारताचा असाच प्रभाव पडला आहे वाकाटक नृपति सर्वसेन (खिस्तोत्तर ४ थे शतक) याच्या 'हरिविजय' नामक प्राकृत काव्याचा विषय श्रीकृष्णाचे पारिजातहरण हा होता यानतरच्या भारवीचे 'किरातार्जुनीय' व माघाचे 'शिशुपालवध' याची गणना सस्कृतच्या पचमहाकाव्यात होते खिस्तोत्तर बाराव्या शतकातल्या श्रीहर्षानें महाभारतातील नलदमयतीच्या रम्य कथेवर बावीस सर्गांचे श्लेषादि विविध अलकारानी नटलेले 'नैषधचरित' महाकाव्य रचले होते ते संस्कृत

काव्यवाङ्मयात अप्रतिम गणले गेलें आहे याशिवाय वामनभट्टाचे ‘ नलाभ्युदय ’, अमरचद्रसूरीचे ‘ बालभारत ’, वास्तुपालाचे ‘ नारायणानन्द ’, लोलिबराजाचे ‘ हरिविलास ’, वेकटनाथाचे ‘ यादवाभ्युदय ’, राजचूडामणि दीक्षिताचे ‘ रुक्मिणीकल्याण ’, वासुदेवाचे ‘ नलोदय ’, जयदेवाचे ‘ गीतगोविद ’ इत्यादि काव्ये महाभारतातील व हरिवशातील कथावर रचली आहेत

ख्रिस्तोत्तर सातव्या शतकापासून बहुलार्थी काव्ये लिहिण्यास सुरवात झाली यातील बहुतेकात महाभारत व रामायण याच्या कथा श्लेषाच्या साहाय्याने त्याच श्लोकात वर्णिल्या असतात या प्रकारचा पहिला प्रयत्न दण्डीचा होता असे दिसते त्याच्या द्विसधान काव्याचा उल्लेख भोजाच्या ‘ शृगारप्रकाशात ’ केला आहे. यानतर कविराजाचे ‘ राघवपाण्डवीय ’, हरदत्तसूरीचे ‘ राघवनैषधीय ’ इत्यादि या प्रकारची काव्ये रचण्यात आली. काही काव्यात तर चार-चार पाच-पाच विषय एकदम वर्णिले असतात. अशा तऱ्हेचे ‘ नलयादवपाडवराघवीयम् ’ नामक चार चरित्रे एकदम वर्णन करण्याचे काव्य काही वर्षांपूर्वी मद्रासकडे सापडले होते

गद्यपद्यमय काव्याला सस्कृतमध्ये चम्पू अशी सज्ञा आहे अशी अनेक चम्पूकाव्ये महाभारतातील कथावर रचली आहेत त्यापेकी सर्वांत प्राचीन ‘ नलचम्पू ’ नामक काव्य वैदर्भ कवि त्रिविक्रमभट्ट याने ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकात लिहिले होते त्यात नलाची कथा श्लेषप्रचुर शैलीत वर्णिली आहे. त्यानतर अनतभट्टाचे ‘ भारतचम्पू,’ शेषकृष्णाचे ‘ पारिजातहरणचम्पू ’ इत्यादि अनेक या तऱ्हेची काव्ये रचण्यात आली, त्यातील बहुतेकाचे विषय महाभारत-हरिवशातून घेतले आहेत

येथपर्यंत दिलेल्या त्रोटक माहितीवरून सस्कृत वाङ्मयावर महाभारताचा किती प्रभाव पडला आहे हे दिसून येईल

**महाभारतसाराचा** प्रस्तुत खड हा तिसरा व शेवटचा होय यामध्ये शान्तिपर्व, अनुशासनपर्व, आश्वमेधिकपर्व, आश्रमवासिकपर्व, मौसलपर्व, महाप्रस्थानिकपर्व आणि स्वर्गारोहणपर्व अशी महाभारताची शेवटची सात पर्वे आली आहेत त्यामध्यें भारतीय युद्धानतरचें पाडवाचे चरित्र वर्णिलें आहे

भारतीय युद्धात झालेल्या स्वजनहानीमुळे विशेषत आपला वडील भाऊ कर्ण याच्या वधामुळे युधिष्ठिराला अत्यंत दु ख होते. अर्जुनादि त्याचे बधु, द्रौपदी, व्यास व स्वत भगवान् श्रीकृष्ण हे त्याचे नानाप्रकारे सान्त्वन करतात, तरी त्याच्या मनाला शाति मिळत नाही तेव्हा श्रीकृष्णाच्या सूचने-वरून ते सर्व शरपजरी पडलेल्या भीष्माकडे जातात तेथे युधिष्ठिर भीष्माना अनेक प्रकारचे प्रश्न विचारतो व भीष्म त्याची उत्तरें देतात, अशी कथा शान्तिपर्वात आली आहे यानतरच्या अनुशासनपर्वांतहि अशाच प्रकारे भीष्म-युधिष्ठिर सवादात अनेक अन्य प्रश्नाचें विवेचन आलें आहे या पर्वाच्या शेवटी माघाच्या शुक्लपक्षात उत्तरायण लागल्यावर इच्छामरणी भीष्माचे निर्याण वर्णिलें आहे यापुढच्या आश्वमेधिकपर्वांत युधिष्ठिर महर्षि व्यासाच्या आज्ञेवरून अश्वमेधयज्ञाला आरंभ करतो, यज्ञीय अश्वाच्या रक्षणार्थ असलेल्या अर्जुनाचे अनेक देशाच्या राजाशी युद्ध होते, मणिपुरात त्याच्या स्वत च्या बभ्रुवाहननामक पुत्राकडून त्यास मृत्यु येतो, तथापि त्याची पत्नी नागकन्या उलूपी त्याला आपल्याजवळच्या दिव्य मण्याच्या योगानें पुनरुज्जीवित करते, शेवटी यज्ञीय अश्व परत आल्यावर अश्वमेधाची समाप्ति होते, असा कथाभाग आला आहे यापुढच्या आश्रमवासिकपर्वांत धृतराष्ट्र, गान्धारी व कुन्तीचे वनगमन, विदुराचे निर्याण, युधिष्ठिरादि पाडवाचे धृतराष्ट्राश्रमात आगमन, तेथे महर्षि व्यासाच्या कृपेने सर्वांना युद्धात निधन पावलेल्या आप्ताचे दर्शन, पुढे पाडव हस्तिनापुरास परतल्यावर धृतराष्ट्र, गान्धारी व कुन्तीचे दावानलांत दहन व त्यानतर सञ्जयाचें हिमालयात गमन इत्यादि कथा आली आहे मौसलपर्वांत द्वारकेमध्यें यादवाचा परस्परयुद्धात झालेला नाश, तदनतर श्रीकृष्ण व बलराम याचें निर्याण, पुढें वसुदेवाचें निधन व नतर यादवस्त्रिया घेऊन हस्तिनापुरास येताना झालेला अर्जुनाचा पराभव इत्यादिकाचे वर्णन आहे नतरच्या महाप्रस्थानिकपर्वांत पाडवाचे महाप्रस्थान, मार्गांत द्रौपदी, सहदेव, नकुल, अर्जुन व भीम याचें पतन, शेवटी युधिष्ठिराचे एका कुत्र्यासहित स्वर्गद्वारी आगमन, तेथें त्याचें इन्द्राकडून स्वागत, इत्यादिकांचे वर्णन आहे शेवटच्या स्वर्गारोहणपर्वांत युधिष्ठिराला कौरव स्वर्गांत रममाण झालेले व पांडव

नरकात पिचत असलेले दिसतात, तेव्हा तो स्वत स्वर्ग सोडून नरकात जाण्यास तयार होतो, पण साक्षात् धर्म तेथें प्रगट होऊन ही सर्व माया आहे, तुझे सर्व बाधव स्वर्गवासीच आहेत असें त्याला सागतो, तेव्हा युधिष्ठिर देवनदी गगेमध्ये देहत्याग करून स्वर्गांत जातो व तेथे त्याला सर्व कौरवपाडवाची भेट होते असें वर्णिले आहे

प्रस्तुत खडातील सात पर्वांची श्लोकसख्या ५०१७ आहे ही संख्या यापूर्वी कै चितामणराव वैद्यानी प्रकाशित केलेल्या ' सक्षिप्तमहाभारता'च्या श्लोकसख्येच्या साडेतीन पट आहे हे खालील तुलनेवरुन दिसून येईल—

| | सक्षिप्तमहाभारत–श्लोकसख्या | महाभारतसार–श्लोकसंख्या |
|---|---|---|
| शान्तिपर्व | ५९५ | २६७२ |
| अनुशासनपर्व | २७५ | ९०७ |
| आश्वमेधिकपर्व | २०० | ६७५ |
| आश्रमवासिकपर्व | १७० | ४५२ |
| मौसलपर्व | १२३ | १५१ |
| महाप्रस्थानिकपर्व | ३८ | ७४ |
| स्वर्गारोहणपर्व | ५२ | ८६ |
| | १४३३ | ५०१७ |

वरील पर्वांपैकी शान्तिपर्व व अनुशासनपर्व ही अत्यंत महत्त्वाची आहेत. त्यामध्यें भीष्मयुधिष्ठिरसवादात धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, व्यवहार इत्यादिकातील विविध विवाद्य प्रश्नाचे विवेचन आले असल्यामुळे महाभारताचा हा भाग प्राचीन भारतीय सस्कृतीचा ज्ञानकोशच झाला आहे ज्या भीष्मपितामहाच्या मुखाने व्यासानी या प्रश्नाचा ऊहापोह करविला आहे त्याच्याविषयी साक्षात् भगवान् श्रीकृष्ण म्हणतात—

स हि भूत भविष्यच्च भवच्च भरतर्षभ ।
वेत्ति धमविदा श्रेष्ठ तमस्मि मनमा गत. ॥

( शान्ति० श्लो. ६१० )

सर्व वर्तमान, भूत व भविष्य कालाचे ज्ञान भीष्माना असल्यामुळे त्याच्या विवेचनांत अनेक प्राचीन कथाचा उल्लेख आला आहे या कथाचा

आरभ बहुधा ' अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम् ' या शब्दानी होतो व त्या सवादात्मक असतात म्हणून त्याना काहीनी ' इतिहास-सवाद ' असे नाव दिलें आहे या पर्वांतील प्रश्न अत्यत महत्त्वाचे असल्यामुळे त्याच्याविषयी महाभारतकाराचे काय म्हणणे आहे हे येथे सक्षेपाने देण्याचा प्रयत्न केला आहे

महाभारतात वर्णाश्रमधर्मांचा पुरस्कार केला आहे हें सागण्याची आवश्यकता नाही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र याच्या जातिविहित कर्मांचे वर्णन अनेक ठिकाणी आले आहे (उदाहरणार्थ, शान्ति० श्लो ८८५-९०० पाहा ) ही सर्व कर्मे करणे शक्य नसल्यास ब्राह्मणानें निदान वेदाभ्यास, क्षत्रियाने प्रजापालन, वैश्याने पशुपालन व शूद्राने सर्व वर्णांची सेवा करावी असे सागितले आहे ( शान्तिपर्व, श्लो ८८९, ८९४, इत्यादि ) त्यानतर ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व सन्यास किवा भैक्ष्यचर्य या चार आश्रमाचे सविस्तर वर्णन आले आहे सौतीने महाभारताचे शेवटचे संस्करण केले त्या काळा बौद्ध व जैन धर्मांचा प्रचार चालू झाला होता व श्मश्रु न फुटलेले लहान मुलगे आईबाप, बहीणभाऊ इत्यादिकाचा त्याग करून सन्यास घेऊ लागले होते ही प्रवृत्ति समाजधारणेस घातक होती म्हणून महाभारतात तिचा निषेध केला आह शक्रतापससवादात (शान्तिपर्व, श्लो १३५-१३९ ) म्हटले आहे—

केचिद् गृहान् परित्यज्य वनमभ्यागमन् द्विजा ।
अजातश्मश्रवो मन्दा कुले जाता. प्रवव्रजु ॥
धर्मोऽयमिति मन्वाना समृद्धा ब्रह्मचारिण ।
त्यक्त्वा भ्रातॄन् पितॄश्चैव तानिन्द्रोन्वकृपायत ॥
तानाबभाषे भगवान् पक्षी भूत्वा हिरण्मय ।
सुदुष्कर मनुष्यैश्च यत्कृत विघसाशिभि ॥
पुण्यं भवति कर्मेद प्रशस्त चैव जीवितम् ।
सिद्धार्थास्ते गति मुख्या प्राप्ता धर्मपरायणा ॥

यामध्यें ' विघसाशी ' गृहस्थाची प्रशंसा आहे. हे ' विघसाशी ' म्हणजे सकाळ सध्याकाळ आपल्या कुटुबात अन्न तयार करून ते देव, पितर,

अतिथि व स्वत चे ज्ञातिजन याना दिल्यावर अवशिष्ट राहील त्यावर राहणारे लोक होत, (शान्तिपर्व, श्लो १४६) केवळ संन्यासाने मोक्ष मिळत असता तर—

'पर्वताश्च द्रुमाश्चैव क्षिप्रं सिद्धिमवाप्नुयु.।'

असे म्हटले आहे न्यायाने धन मिळवावे, न्यायाने त्याची वृद्धि करावी, आणि प्रयत्नाने त्याचे रक्षण करून धर्माकरिता त्याचा व्यय करावा, वेदाभ्यासानें ऋषीचे, यज्ञानुष्ठानाने देवाचे, श्राद्धाने पितराचे व अतिथिसत्काराने मनुष्याचे ऋण फेडावे, भृत्याशीहि दाक्षिण्याने वागावे, सज्जनाचा सहवास करावा, स्वत च्या श्रमानें व न्यायाने मिळवलेली कवडी दिली तर अन्य प्रकारे मिळविलेल्या हजारो नाण्याच्या दानापेक्षा त्या दानाचे महत्त्व विशेष आहे, जे द्यावयाचे ते श्रद्धेने व स्वयप्रेरणेने दिले तर ते दान श्रेष्ठ होय, असे महाभारताचे सागणे आहे सर्व वर्णांना सारखेच लागू असे 'साधारणधर्म' सागताना पराशर मुनि जनकाला म्हणतात—

आनृशस्यमहिंसा चाप्रमाद सविभागिता ।
श्राद्धकर्मातिथेय च सत्यमक्रोध एव च ॥
स्वेषु दारेषु सन्तोष शौच नित्यानसूयता ।
आत्मज्ञान तितिक्षा च धर्मा साधारणा नृप ॥

(शान्ति० श्लो २४०२–३)

(प्राणिमात्राविषयी अनुकपा, विवेक, धनादिकाचे दान, श्राद्धकर्म, अतिथिसत्कार, सत्यभाषण, क्रोधाचे नियमन, स्वपत्नीविषयी प्रेम, शुचित्व, दुसऱ्याचा हेवा न करणे, आत्मज्ञान व सोशिकपणा हे सर्व वर्णांना सारखेच लागू पडणारे धर्मनियम होत )

महाभारतकारानी चारी वर्णांना त्याची कर्मे घालून दिली असली तरी त्यायोगे उपजीविका होत नसेल तर त्यानी इतर वर्णांची कर्मे काही विशिष्ट मर्यादेपर्यंत केली तरी ते पतित होत नाहीत असेहि म्हटले आहे

क्षत्रधर्मा वैश्यधर्मा नावृत्ति पतते द्विज ।
शूद्रधर्मा यदा तु स्यात्तदा पतति वै द्विज ॥

(शान्ति० श्लो २३६२)

या श्लोकात ब्राह्मणानी विहित वृत्तीच्या अभावी क्षत्रिय व वैश्य याची कर्मे करण्यास हरकत नाही त्यानी शूद्राप्रमाणे दास्य मात्र पतकरू नये असे सागितले आहे

महाभारताच्या तृतीय संस्करणाच्या वेळी भारतावर शक, यवन, पल्हव इत्यादि परकी टोळ्याच्या स्वाऱ्या झाल्या व काही काळ त्यानी या देशात आपले राज्य स्थापिलें या लोकाना आपल्या समाजात स्थान द्यावे किवा नाही, द्यावयाचे असल्यास त्याचा धर्म किवा कर्तव्यकर्मे कोणती, हा प्रश्न तत्कालीन समाजशास्त्रज्ञापुढें उभा राहिला होता यासबधी विस्तृत विवेचन शातिपर्वाच्या ६५ व्या अध्यायांत केले आहे संपादकानी संक्षेप करताना या विवेचनाचा प्रास्ताविक भाग (अध्याय ६५, श्लो १३–१६) गाळला आहे म्हणून या प्रश्नाचे स्वरूप वाचकाच्या ध्यानात स्पष्टपणे कदाचित् येणार नाही या परकी लोकाना महाभारतात 'दस्यु' असे म्हटले आहे या लोकाचा धर्म शान्तिपर्व श्लो ९२३ ९२५ या श्लोकात सागितला आहे. त्यामध्ये म्हटले आहे की त्यानी मातापित्याची, तसेच गुरु, आचार्य, तपस्वी याची सेवा करावी, अहिसा, सत्य, शाति याचे आचरण करावे, एवढेच नव्हे (अष्टकादि) पाकयज्ञहि करावे यावरून तत्कालीन हिदु समाजाने अशा परकी लोकाना दूर न लोटता त्याचा स्वत मध्ये समावेश करून घेतला होता हे दिसून येईल याची अनेक उदाहरणे भारताच्या प्राचीन इतिहासात दिसून येतात अनेक ग्रीक, शक, कुशाग, हूण, गुर्जर लोक हिदुधर्म स्वीकारून शिव, स्कन्द, वासुदेव इत्यादि देवाचे भक्त बनले होते, हे प्राचीन कोरीव लेख व नाणी यावरून सिद्ध झाले आहे

शान्तिपर्वाच्या एका बऱ्याच मोठ्या, बहात्तर अध्यायाच्या भागाला राजधर्मानुशासनपर्व असे म्हटले आहे व त्यात अनेक राजकीय प्रश्नाचा ऊहापोह केला आहे. प्राचीन काळी राजनीतिविषयक ग्रथाना अर्थशास्त्र असें म्हणत उदाहरणार्थ, कौटिल्याचे 'अर्थशास्त्र' पाहा महाभारतात अशा प्रश्नाची चर्चा आल्यामुळें त्याला प्रास्ताविक श्लोकांत 'अर्थशास्त्र' असे म्हटले आहे. या प्रश्नाविषयी येथे थोडी माहिती देणें अप्रस्तुत होणार नाही

कृतयुगात राजसत्ता अस्तित्वात आली नव्हती प्रजा स्वत च परस्पराचे रक्षण करीत पण पुढें त्यामध्ये त्याना फार श्रम पडू लागले शिवाय, लोकामध्ये मोह, लोभ, राग, काम इत्यादिकाचा उद्भव होऊन धर्माचा नाश झाला समाजात 'मात्स्यन्याय' प्रचलित झाला मोठा मासा लहान माशाला गिळतो त्याप्रमाणे बलवान् लोक दुर्बलाचा नाश करू लागले (श्लो ८२५-८३२, ९४९) तेव्हा लोकाच्या प्रार्थनेवरून ब्रह्मदेवाने मनूला राजा होण्यास सागितले मनु तसे करण्यास नाखूष होता तो म्हणाला—

बिभेमि कर्मण पापाद्राज्य हि भृशदुस्तरम् ।
विशेषतो मनुष्येषु मिथ्यावृत्तेषु नित्यदा ॥

(शान्ति० श्लो ९५२)

प्राण्यावर, विशेषत मिथ्याचरणी मनुष्यावर राज्य करणे अत्यंत कठीण आहे त्यामुळे लागणाऱ्या पापाची मला भीति वाटते त्यावर लोक म्हणाले, "मनु, भिऊ नको 'कर्तॄनेनो गमिष्यति।' जो पापाचरण करील तो त्याबद्दल जबाबदार धरला जाईल" शिवाय, त्यानी त्याला पशु व सुवर्ण (सपत्ति) याचा पन्नासावा भाग, धान्याचा दहावा भाग इत्यादि करभार देण्याचेहि कबूल केले याखेरीज तू आमचे चागले रक्षण केलेस तर आम्ही जे धर्माचरण करूं त्याच्या पुण्याचा चतुर्थांश भाग तुला मिळेल असेहि त्यानी मनूला सागितले तेव्हा मनु राजा होण्यास कबूल झाला या कथेत राजसत्ता ही प्रथम कराररूपाने अस्तित्वात आली ही Social Contract ची (सामाजिक कराराची) कल्पना मूलभूत आहे. राज्याभिषेकाच्या वेळी राजाकडून खालील प्रतिज्ञेचा उच्चार करविण्यात येत असे—

प्रतिज्ञा चाधिरोहस्व कर्मणा मनसा गिरा ।
पालयिष्यम्यह भौम ब्रह्म इत्येव चासकृत् ॥
यश्चात्र धर्मो नित्योक्तो दण्डनीतिव्यपाश्रय ।
तमशङ्क करिष्यामि स्ववशो न कदाचन ॥

(शान्ति० श्लो ८७०-७१)

'मी प्रजेचे आणि तिच्या संस्कृतीचे व धर्माचे रक्षण करीन, राजनीतिशास्त्राप्रमाणे वागेन, कधीहि केवळ स्वेच्छेने वर्तन करणार नाही' असा या प्रतिज्ञेचा अर्थ आहे.

राजाचे मुख्य कर्तव्य म्हणजे प्रजेचे पालन करणे हे होय. हे राजाच्या मनावर ठसविण्याकरिता धर्मशास्त्रकारानी असा नियम घालून दिला होता की जर चोरीचा पत्ता लावून अपहरण केलेले धन मालकाला परत करता आले नाही, तर राजाने ते आपल्या खजीन्यातून दिले पाहिजे—

प्रत्याहर्तुमशक्य स्याद्धन चौरैर्हृत यदि ।
तत्स्वकोशात्प्रदेय स्यादशक्तेनोपजीवत ॥

( शान्ति० श्लो ११०८ )

पण राज्य हे केवळ पोलीस स्टेट किवा 'सरक्षक राज्य' नसून ते वेलफेअर स्टेट ( कल्याणकारी राज्य ) झाले पाहिजे हे भीष्मानी प्रतिपादिले आहे ते म्हणतात—

कृपणानाथवृद्धाना विधवाना च योषिताम् ।
योगक्षेम च वृत्ति च नित्यमेव प्रकल्पयेत् ॥
आश्रमेषु यथाकाल चैलभाजनभोजनम् ।
सदैवोपहरेद्राजा सत्कृत्याभ्यर्च्य मान्य च ॥

( शान्ति० श्लो १२७६–७७ )

इग्लडासारख्या पाश्चात्य राष्ट्रात वार्द्धक्यवृत्तीची ( ओल्ड् एज पेन्शनूची ) योजना अलीकडे अमलात आली आहे पण तिची कल्पना आमच्या राजनीतिज्ञाना हजारो वर्षांपूर्वी आली होती गुरुकुलामध्ये तसेंच तपस्व्याच्या आश्रमामध्ये विविध विद्याचें अध्ययन–अध्यापन, तत्त्वज्ञानादि विषयाची चर्चा होत असे तेव्हा त्याना जरूर ती वस्त्रे, पात्रे व भोजनसामग्री पुरविण्याची जबाबदारी राजाची असे या आश्रमावर आक्रमणाची भीति नसे, म्हणून सकटकाळी राजादिकाना यामध्ये आश्रय मिळे ( श्लोक १२७९ ) रक्षण पोषण व शिक्षण याच्यायोगे प्रजेचे रञ्जन करणारा तो राजा ( **रञ्जिताश्च प्रजा· सर्वास्तेन राजेति शब्द्यते** । श्लोक ८७८ ) ही राजशब्दाची शान्तिपर्वांत दिलेली व्युत्पत्ति उत्तरकालीन कालिदासादि कवींनी स्वीकारली आहे

राजानें अष्ट मंत्र्याची परिषद् नेमून त्याचा सल्ला घ्यावा त्याने आपले अमात्य किवा अधिकारी सर्व वर्णांतून घ्यावे असाहि नियम भीष्मानी घालून दिला आहे

चतुरो ब्राह्मणान् वैद्यान् प्रगल्भान् स्नातकान् शुचीन् ।
क्षत्रियाश्च तथा चाष्टौ बलिन शस्त्रपाणिन ॥
वैश्यान्वित्तेन सम्पन्नानेकविंशतिसख्यया ।
त्रींश्च शूद्रान्विनीतांश्च शुचीन् कर्मणि पूर्वके ॥
(शान्ति० श्लो १२४८-४९)

अमात्य किंवा सचिव नेमताना राजाने त्याच्या कुलीनत्वाला विशेष महत्त्व द्यावे कारण कुलीन मनुष्याची लाच घेणें यासारख्या पापकर्माकडे सहसा प्रवृत्ति होत नाही याच्या उलट अकुलीन मनुष्याला एकदम ऐश्वर्य प्राप्त झाल्यास तो आपल्या मनाविरुद्ध कोणी बोलल्यास शत्रु बनतो असे भीष्मानी म्हटले आहे तेंहि व्यवहारात अनेकदा प्रत्ययास येतें

महाभारतकाळी भारतात बहुधा सर्वत्र राजसत्ता प्रचलित होती काही ठिकाणी मात्र गणराज्ये टिकून राहिली होती या गणराज्याच्या अभिवृद्धी-करिता व संरक्षणाकरिता कोणत्या गोष्टीची काळजी घेतली पाहिजे हे भीष्मानी शान्ति० श्लो १३७७-१३८३ या श्लोकात सागितले आहे ते सध्याच्या भारतीय गणराज्यशासकानी लक्षात ठेवण्यासारखे आहे भीष्म म्हणतात, 'गणाना लोभ, क्रोध व भेद यापासून भीति असते गणाच्या सर्व सभासदाच्या सभेत मन्त्रचर्चा करू नये गणाने काही प्रमुख सभा-सदाचें मडळ नेमावें व त्याने चर्चा करून गणाच्या हिताची कार्यें करावी कारण—

जात्या च सदृशा सव कुलेन सदृशास्तथा ।
न चोद्योगेन बुद्धया वा रूपद्रव्येण वा पुन ॥
(शान्ति० श्लो १३८१)

'गणाचे सभासद जाति व कुल या बाबतीत सारखे असले तरी उद्योग, बुद्धिमत्ता, सपत्ति इत्यादिकात समान नसतात'

याशिवाय कर, राज्याकरिता काढावयाचो कर्ज (स्टेट लोन) इत्यादिका-विषयी उपयुक्त सूचना भीष्माच्या भाषणात आहेत राजाने लोभाने प्रजेवर तिला असह्य होईल असा कर लादू नये कारण,

ऊधश्छिन्द्यात्तु यो धेन्वा. क्षीरार्थी न लभेत्पय ।

( शान्ति० श्लो १०७८ )

गाईची कास जर छाटून टाकली तर दूध कोठून मिळणार? लोभी व्यापारी किमती भरमसाट वाढवून लोकाना पिळून काढतात म्हणून धान्यादिकाच्या किमती ठरवून द्याव्या श्रोत्रिय म्हणजे वेदाभ्यासरत ब्राह्मणानाच फक्त कर माफ करावा इतर अश्रोत्रिय व अग्न्याधान न करणाऱ्या ब्राह्मणावर कर बसवावा व त्याच्याकडून वेठीची कामहि करवून घ्यावी असे भीष्मानी स्पष्ट म्हटले आहे ( शान्ति० श्लो ११३१ )

राजा दुर्वृत्त निघून प्रजेला छळू लागल्यास ब्राह्मणानी शक्य त्या उपायानी, प्रसगी शस्त्रधारणहि करून, त्याचे नियमन करावे असे भीष्मानी म्हटले आहे—

तपसा ब्रह्मचर्येण शस्त्रेण च बलेन च ।
अमायया मायया च नियन्तव्य तदा भवेत् ॥

( शान्ति० श्लो ११४२ )

तसेच दस्यूनी म्हणजे परकी लोकानी राज्यावर स्वारी केली व क्षत्रिय त्याचें निवारण करण्यास असमर्थ ठरले तर ब्राह्मणानी शस्त्र धारण करण्यास प्रत्यवाय नाही असेंहि म्हटले आहे

**यानंतर आपण मोक्षधर्माचा विचार करूं**

सुलभा-जनक-सवादात ( शान्ति० श्लो २५२० ) कर्मनिष्ठा, ज्ञाननिष्ठा व त्याहून भिन्न अशी तिसरी निष्ठा, अशा तीन निष्ठा किंवा मोक्षाचे उपाय सागितले आहेत कर्मनिष्ठा किंवा प्रवृत्तिमार्ग हा फार प्राचीन काळापासून भारतात प्रचलित आहे वेदाचें अध्ययन करावे, विद्वान् व्हावे, धनार्जन करावे, यथाशक्ति यज्ञ करावे हा शाश्वत भूतिपथ किंवा अभ्युदयाचा मार्ग आहे असें एके ठिकाणी म्हटलें आहे ( शान्ति० श्लो १०७ ) पण कालातराने, विशेषत बौद्ध व जैन धर्मानी उपदेशिलेल्या अहिंसाधर्मामुळे यज्ञयाग करण्याकडे लोकाची प्रवृत्ति कमी होऊ लागली असें दिसतें आश्वमेधिकपर्वातील शक्र-ऋत्विक्सवादात यज्ञामध्ये पशुहनन करण्यास उद्युक्त झालेल्या शक्रास ऋषि म्हणतात—

धर्मोपघातकस्त्वेष समारम्भस्तव प्रभो ।
नाय धर्मकृतो यज्ञो न हिंसा धर्म उच्यते ॥

(आश्व० श्लो ६२६)

' ज्याच्यामध्ये हिंसा होत आहे असा हा यज्ञ धर्मकृत्य नसून धर्मविघातक आहे ' नतर ते शक्र व ऋत्विज या गोष्टीचा निर्णय करून घेण्याकरिता वसु राजाकडे गेले त्यानें त्या दोघाचे म्हणणे ऐकून घेऊन खालील निर्णय दिला—

उञ्छ मूल फल शाकमुदपात्र तपोधना ।
दान विभवतो दत्त्वा नरा स्वर्यान्ति धार्मिका ॥
एप धर्मो महायोगो दान भूतदया तथा ।
ब्रह्मचर्य तथा सत्यमनुक्रोशो धृति क्षमा ॥
सनातनस्य धर्मस्य मूलमेतत्सनातनम् ॥

(आश्व० श्लो ६३६-६३८)

( वेचलेले धान्य, कदमूल, उदकपात्र इत्यादि यथाशक्ति दान केल्याने स्वर्गप्राप्ति होते दान, भूतदया, ब्रह्मचर्य, सत्यवचन, अनुकपा, सतोष व क्षमा हीच सनातन धर्माची मूलभूत तत्त्वे होत )

याच विचारसरणीस अनुसरून आश्वमेधिकपर्वांत एका मुंगुसाची गोष्ट सागितली आहे एका उञ्छवृत्ति गरीब ब्राह्मणाने व त्याच्या कुटुबाने आपण अत्यत क्षुधित असताहि आपलें सर्व सक्तुरूपी अन्न अतिथीला दान केले त्या ठिकाणी लोळलेल्या मुगुसाच्या शरीराचा अर्धा भाग सुवर्णमय झाला, पण राहिलेला अर्धा भाग युधिष्ठिराच्या सुसम्पन्न यज्ञात तो मुगुस लोळला असताहि पूर्ववत् राहिला अशी गोष्ट त्या पर्वांत सागून त्यायोगे पशुयज्ञाचे वैयर्थ्य दर्शविले आहे

प्रवृत्ति मार्गाच्या विरुद्ध निवृत्तिमार्ग खालील श्लोकात प्रतिपादिला आहे—

निवृत्तिलक्षणस्त्वन्यो धर्मो मोक्षाय तिष्ठति ।
सर्वभूतदया धर्मो न चैकग्रामवासिता ॥
आशापाशविमोक्षश्च शस्यते मोक्षकाङ्क्षिणाम् ।

न कुड्या नोदके सङ्गो न वाससि न चासने ।
न त्रिदण्डे न शयने नाग्नौ न शरणालये ॥
अध्यात्मगतिचित्तो यस्तन्मनास्तत्परायण ।
आत्मन्येवात्मनो भाव समासज्जेत वै द्विज ॥
एष मोक्षविदा धर्मो वेदोक्त सत्पथ सताम् ॥

( अनुशासन० श्लो ७९७ ७९९ )

हा निवृत्तिलक्षण किवा सन्यासमार्ग होय पण केवळ ससारत्याग केल्यानें व त्रिदडी सन्यास घेतल्याने मोक्ष साध्य होत नाही सुलभा-जनकसवादात राजर्षि जनक म्हणतो—

काषायधारण मौण्ड्य त्रिविष्टब्ध कमण्डलुम् ।
लिङ्गान्युत्पथभूतानि न मोक्षायेति मे मति ॥
आकिञ्चन्ये न मोक्षोऽस्ति किञ्चन्ये नास्ति बन्धनम् ।
किञ्चन्ये चेतरे चैव जन्तुर्ज्ञानेन मुच्यते ॥

( शान्ति० श्लो २५२८-२५३१ )

केवळ काषायवस्त्रें धारण केली, डोक्याचे मुंडन केलें, दडकमडलु घेतले म्हणजे मोक्ष प्राप्त होत नाही दारिद्य हे मोक्षाचे साधन नाही आणि मनुष्य अगदी दरिद्री नाही म्हणून तो बद्ध होतो असेहि नाही ज्ञानानेच मोक्ष मिळतो व तें ज्ञान गृहस्थाश्रमातहि प्राप्त होते, हें सुलभाजनकसवादात तसेच तुलाधार-जाजलि-सवादात सागितले आहे तुलाधार जाजलीला म्हणतो—

वेदाह जाजले धर्म सरहस्य सनातनम् ।
सर्वभूतहित मैत्र पुराण य जना विदु ॥

( शान्ति० श्लो २१६७ )

सर्वेषा य सुहृन्नित्य सर्वेषा च हिते रत ।

( शान्ति० श्लो २१६९ )

या वृत्ति म परो धर्मस्तेन जीवामि भूतले ॥

( शान्ति० श्लो २१६८ )

असा हा सर्वभूतहितरत तुलाधार आपल्या नेहेमीच्या व्यवसायात तराजूने गिऱ्हाइकाना माल देत असलेला जाजलीला दिसला त्याची सर्व वागणूक स्थितप्रज्ञाला शोभेल अशी होती तो जाजलीला म्हणतो—

तुला मे सर्वभूतेषु समा तिष्ठति जाजले ।
नाह परेषा कृत्यानि प्रशसामि न गर्हये ।।
(शान्ति० श्लो २१७१)

यो हन्याद्यश्च मा स्तौति तत्रापि शृणु जाजले ।
समौ तावपि मे स्याता न हि मेऽस्ति प्रियाप्रियम् ।।
( शान्ति० श्लो २१८० )

ही ती तिसरी निष्ठा जिचा अवलंब जनकाने केला होता ससारात राहून व प्राप्त झालेली कर्मे यथावत् करून त्यापासून निर्लेप राहणे, कोणावर प्रेम किवा द्वेष न करता सदैव सर्वभूतरत असणे हें या मार्गाचे वैशिष्ट्य आहे यालाच श्रीमद्भगवद्गीतेत ‘ निष्कामकर्मयोग ’ हें नाव दिले आहे

साख्यमतसस्थापक कपिल मुनीचा, तसेच त्याचा प्रशिष्य पंचशिख याचाहि उल्लेख प्रस्तुत खडात आला आहे महाभारतातील साख्य व नतरचे साख्यदर्शन याचा परस्पर सबध काय आहे हा प्रश्न वादग्रस्त आहे त्याचे विवेचन करण्यास उपयुक्त ते सर्व श्लोक प्रस्तुत **‘महाभारतसारां’त** आले नसल्यामुळे तो प्रयत्न येथे करणे शक्य नाही तसेच श्रीमद्भगवद्गीता ज्या भागवत धर्माची म्हणून मानण्यात येते त्या धर्माचे मूळ स्वरूप दाखविणारे ( शातिपर्व, अ ३३५-३४७ यातील ) नारायणीयोपाख्यानहि या **‘सारां’त** आले नाही ही एक उणीव भासते तथापि संक्षेपकाना संक्षेप करताना काय घेऊं आणि काय टाकू असे झाले असले पाहिजे **तेव्हा त्यानीं महाभारतदुग्धाचे हे नवनीत आपणांस काढून दिले आहे त्याचाच रसास्वाद कृतज्ञतेनें घेतला पाहिजे** असो

शातिपर्व व अनुशासनपर्व हा महाभारत ग्रथाचा गाभा आहे असे वरील विवेचनावरून दिसून आले असेल वरील प्रमुख विषयाखेरीज अनेक अवातर विषयाचे विवेचनहि त्यामध्ये प्रसगोपात्त आले आहे उदाहरणार्थ,

दैव की प्रयत्न श्रेष्ठ, ( अनुशासन० ११०-१२३ ), लक्ष्मीचे वास्तव्य कोठें असते ( उपर्युक्त, १२४ १३८ ), मनुष्यानें व्यवहारात कसे वागावें ( उपर्युक्त, १३९-१४९ ), गोप्रशसा ( उपर्युक्त, ३७२-३७७ ), तलाव, उद्यानें इत्यादि पूर्त कर्मांची तसेच दानाची प्रशसा (उपर्युक्त, ४४९-५३०), आचरणाचे नियम ( उपर्युक्त, ६५२-७३६ ) इत्यादि अनेक विषयाचे अत्यत रोचक व हितकारक विवेचन या खडात आले आहे ते सर्वच मूळातून वाचले पाहिजे. ह्या विविध विषयाचे विवेचन असलेला हा ग्रथ पाहिला म्हणजे त्याच्या खालील वर्णनात यत्किञ्चित्‌हि अतिशयोक्ति नाही अशी वाचकाची खात्री होईल—

अर्थशास्त्रमिद प्रोक्त धर्मशास्त्रमिद महत्।
कामशास्त्रमिद प्रोक्त व्यासेनामितबुद्धिना ॥

महाभारतसार, प्रथमखण्ड, आदिपर्व, श्लोक २१.

अशा प्रकारचा बहुमूल्य ग्रथ सामान्य सस्कृतज्ञ वाचकाच्या आटोक्यात आणून दिला याबद्दल या 'महाभारतसारा'च्या सपादकांचे व विशेषत. प्रकाशक श्री शंकररावजी सरनाईक याचे मनःपूर्वक अभिनंदन करून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतों

श्रावण कृष्ण एकादशी,
शालिवाहन सवत् १८७८

वा वि मिराशी
महामहोपाध्याय

॥ श्री ॥

# श्रीमहाभारतसारस्य तृतीयखण्डस्य प्रस्तावनायाः संस्कृतभाषानुवादः ।

यथा समुद्रो भगवान् यथा मेरुर्महागिरि ।
उभौ ख्यातौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥

(महाभारतसारे प्रथम खण्डे आदिपर्वणि श्लोक २६५)

श्रीमहाभारतसारस्य प्रथमद्वितीयखण्डयो प्रास्ताविके, महाभारतीयनैकविधविषयाणा विचार सञ्जातोऽसि। नात्र तत्पुनरुक्तिरावश्यकी। पर तत्र येषा विचार असञ्जातप्राय तेषामेव कतिपयविषयाणा विचारोऽत्र कर्तव्य इति मे मनीषा वर्तते।

रामायण महाभारत च द्वयमपि आर्षमहाकाव्यत्वेन यद्यपि प्रसिद्ध, तथापि रामायणमेव मुख्यतया आदिकाव्यत्वेनोल्लिख्यते। तस्य प्राचीनत्व तत्काव्यगुणाश्च समीक्ष्य तस्य तदभिधान यथार्थमेव प्रतिभाति। महाभारत तु मुख्यत्वेन इतिहासो विद्यते। तत्र काव्यदृष्टया उत्कृष्टभागा यद्यपि सन्ति, तथापि इतिहासत्वेनैव तस्य ग्रन्थस्य महत्त्व वर्तते। स्वय महाभारतकारेणापि तस्य निर्देश इतिहासत्वेनैव कृतो दृश्यते—

इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धय ।
पञ्चभ्य इव भूतेभ्यो लोकसविधयस्त्रय ॥ इति।

(महाभारतसारे प्रथमखण्डे आदिपर्वणि श्लोक २३)

## महाभारतग्रन्थे कौरवपाण्डवसङ्ग्रामस्य इतिहासः विद्यते।

अय सङ्ग्रामो वास्तविको न वा? वास्तविकश्चेत्कदा सवृत्त? तत्कर्तारो योधा ऐतिहासिका काल्पनिका वा? तद्वर्णन प्रथम कदा लिखितम्? पश्चात्तस्मिन्कथ प्रक्षेपा प्रविष्टा? आधुनिकमहाभारतस्य क काल? इत्यादिप्रश्ना अनेकै परदेशीयैर्भारतीयैश्च विद्वद्भि जिज्ञासावृत्त्या गभीरतया चर्चिता सन्ति। तत्परिचय सङ्क्षेपेणात्र क्रियते।

अय महाभारतग्रन्थ भरतकुलोत्पन्नाना कौरवपाण्डवाना युद्धवर्णनपरो विद्यते। साम्प्रदायिकमतेन इद युद्ध द्वापरयुगस्य अन्तिमभागे सवृत्तम्। युद्धावसानकाल एव कलियुगस्य युधिष्ठिरकालस्य च प्रारम्भ समभूत्। अय काल खिस्तपूर्वं ३१०१ तमे वर्षे प्रारब्ध इति पारम्परिकं मत दृश्यते। तथापि खिस्तोत्तरसप्तमशताब्दीपर्यन्तमुत्कीर्णलेखेषु अस्य कालस्योल्लेख न समुपलभ्यते। वराहमिहिरमतेन शककालारम्भात्पूर्वं २५२६ तमे वर्षे (खिस्तपूर्वं २६०४ तमे वर्षे) युधिष्ठिरस्य राज्याभिषेक सञ्जात। लोकमान्यतिलकमतेन तु इद युद्धं खिस्तपूर्वं १४००तमे वर्षे सवृत्तम्। भारतीययुद्धस्य कालविषये एवविविधानि विविधानि मतानि दरीदृश्यन्ते।

केचिद्वदन्ति, 'एतादृश युद्ध नाभूदेव'। तस्य युद्धस्य तद्युद्धकर्तॄणा दुर्योधन-दुशासन-कर्ण-भीमार्जुनादिप्रमुखपुरुषाणा च प्राचीनवैदिकवाङ्मये उल्लेखाभाव च स्वमतस्य प्रमाणत्वेन ते उपन्यस्यन्ति। परम् अस्य प्रमाणस्य अभावात्मकत्वात्, वैदिकवाङ्मये तदुल्लेखावश्यकतासिद्धि विना न तद् विचारसहम्। अन्यच्च महाभारतीयव्यक्तीना नामानि वैदिकवाङ्मये नैव दृश्यन्ते इत्यपि वक्तु न शक्यम्। तथाहि अथर्ववेदस्य कुन्तापसूक्ते (१२७, ७-१०) परिक्षिद्राज्यवर्णनप्रसङ्गे निम्नलिखित मन्त्रद्वय दृश्यते।

" कतरत्त आहराणि दधि मन्था परि श्रुतम्।
जाया पति वि पृच्छति राष्ट्रे राज्ञ परिक्षित ॥ १ ॥
अभीवस्व प्र जिहीते यव पक्व पथो बिलम्।
जन स भद्रमेधति राष्ट्रे राज्ञ परिक्षित ॥ २ ॥ इति।

(१) परिक्षिद्राज्ञ राष्ट्रे पत्नी पति पृच्छति 'अह कि परिवेषयामि दधि, तक्रम्, दुग्ध वा' इति।

(२) पक्वयवा प्रकाशवत् भाजनाद्बहिर्निगच्छन्ति। परिक्षिद्राजस्य राष्ट्रे लोका कल्याणकारिणी समृद्धि लभन्ते।

ब्राह्मणग्रन्थे परिक्षित्पुत्रस्य जनमेजयस्य दुष्यन्तपुत्रस्य भरतस्य च, काठकसहिताया विचित्रवीर्यपुत्रस्य धृतराष्ट्रस्य च नामोल्लेखो विद्यते। तस्मात् महाभारतीयाना कासाञ्चिद् व्यक्तीना तद्वशजाना च नामानि वैदिकवाङ्मये समुपलभ्यन्ते इत्यत्र नास्ति शङ्कावसर। शाङ्खायनश्रौतसूत्रे कौरवाणा

पराजय कुरुक्षेत्रीययुद्धे सपूर्णतया सञ्जात इति वर्णितमस्ति। पाणिनिविरचिते अष्टाध्यायीनामके सूत्रग्रन्थे युधिष्ठिर भीम-विदुरनाम्ना व्युत्पत्तिनियमाः दृश्यन्ते। तस्मात् महाभारतनिर्दिष्टा पुरुषा नि सशयम् ऐतिहासिका सन्ति। अपि च महाभारते वर्णित युद्ध यद्यपि याथातथ्येन न सभूत स्यात्तथापि कौरव-पाण्डवयुद्धसदृश किमपि युद्ध प्राचीनकाले—वेदकालस्य अन्तिमभागे—सभूतमेव स्यात् इति निष्प्रत्यूह तर्कयितु शक्यम्।

महाभारतग्रन्थात् एतदपि ज्ञायते यत् कौरवपाण्डवीययुद्धवर्णनात्मकग्रन्थ तस्मिन्नेव काले कृष्णद्वैपायनेन व्यासेन रचित स्वीयपञ्चशिष्येभ्य पाठितश्च। तस्य ग्रन्थस्य 'जय' इति नाम आसीत् (**जयनामेतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीषुणा॥** आदिपर्व, अध्याय ६२, श्लोक २०)। अन्वर्थं च तन्नाम यत तस्मिन् पाण्डवकृतस्य कौरवजयस्य वर्णनमासीत्। एतादृशयुद्धवर्णनपद्धति वेदकाले आसीत् इति ऋग्वेदान्तर्गतसप्तममण्डलीयात् अष्टादशसूक्तात् स्पष्टीभवति। तस्मिन्सूक्ते दिवोदासपुत्रेण सुदासेन कृतस्य दशाना राज्ञा विजयस्य मनोहर वर्णन विद्यते। तस्मिन्नेव मण्डले तस्य युद्धस्य असकृदुल्लेखदर्शनात् तत् 'दाशराज्ञं' युद्ध प्रसिद्धतरमासीत् ऋग्वेदकाले इत्यपि ज्ञायते। ईदृशानामैतिहासिकघटनाना राजवंशादेश्च वर्णनं यस्मिन्वाङ्मये आसीत् तत् वाङ्मयम् 'इतिहास' इति संज्ञा लभते स्म। शतपथब्राह्मणे, छान्दोग्योपनिषदि च इतिहासपुराणाना वेदत्वेन पञ्चमवेदत्वेन च क्रमेण निर्देशात् तेषा कीदृश माहात्म्यमासीत् तत्स्पष्टीभवति। किंबहुना, वेदार्थकरणे यथा याज्ञिकपद्धति नैरुक्तपद्धतिश्च तथा ऐतिहासिकपद्धतिरपि स्वतन्त्रैव आसीत्। ऋग्वेदे वर्णितम् इन्द्रवृत्रादि युद्धं न रूपकात्मकं किन्तु वास्तविकमेव तद्वृत्तमिति ऐतिहासिकमत यास्काचार्यै स्वोपज्ञे निरुक्तनामके ग्रन्थे निर्दिष्टं विद्यते। अपि च 'नाराशंसी गाथा' नामकस्य प्रशसात्मककाव्यस्य उल्लेख शतपथब्राह्मणे विद्यते। तस्मात् इतिहासात्मक बहुविध वाङ्मय वेदकाले एव निर्मितमासीत् इति नि सशय प्रतीयते। अत कौरवपाण्डवीययुद्धवर्णनात्मकस्य जयग्रन्थस्यापि रचना प्राचीनकाले संभवतितराम्। अयमेव जयग्रन्थ इदानीन्तनस्य महाभारतग्रन्थस्य मूलस्वरूपभूत ।

जयग्रन्थस्य श्लोकसङ्ख्या अद्य साधनाभावान्न निर्णेतुं शक्यते। महाभारते एकस्मिन् श्लोके अष्टशतोत्तरा अष्टसहस्रमिता या श्लोकसङ्ख्या दृश्यते सैव जयग्रन्थस्य श्लोकसङ्ख्या इति केचिन्मन्यन्ते। परं सा सङ्ख्या कूटश्लोकानां विद्यते इति अधस्तनश्लोकात्प्रतीयते। व्यास उवाच।

अष्टौ श्लोकसहस्राणि अष्टौ श्लोकशतानि च।
अहं वेद्मि शुको वेत्ति सञ्जयो वेत्ति वा न वा॥

आदि०, अ०१, श्लो ८१

अनेकवर्षसहस्रेभ्यः प्राक् रचितस्य अस्य जयग्रन्थस्य मूलस्वरूपं सुतरां परिवर्तितं स्यात्। अतः इदानींतनमहाभारते अयमेव भागः स इति वक्तुं न शक्यम्। वैदिकभाषाया इदानीन्तनमहाभारतभाषाया अतीव भिन्नत्वात् व्यासरचितो जयग्रन्थो मूलस्वरूपेण नोपलभ्यते इति तु स्पष्टमेव।

युद्धवर्णनात्मकानि काव्यानि सूता मागधा वा प्राचीनकाले राजसभायां, योधानामुत्तेजनार्थं रणभूमौ वा गायन्ति स्म। इयं रीतिरर्वाचीनकालपर्यन्तं प्रचलिता आसीत्। मध्यप्रदेशीयजबलपुरमण्डलान्तर्गत 'कारीतलाई' स्थाने समुपलब्धे, खिस्तोत्तरदशमशताब्द्यां संभूतस्य सोमेश्वरभट्टनामकस्य मन्त्रिणः शिलालेखे तन्मन्त्रिस्तुतिपरोऽधस्तनः श्लोको विद्यते।

शस्तं यद्यज्ञभूमौ रणशिरसि सदा शंसितं होतृसूतै-
र्गीतं षड्जादिभेदैरतिमधुरगिरोद्गातृभिर्गाथकैश्च।
अध्वर्युः कर्मवर्यं प्रचरति च करी दानसंसिक्तहस्त-
स्तस्य श्रीभट्टसोमेश्वरगुणगणने के वयं तुच्छवाचः॥ इति।

राजपुत्राणां (राजपूत) सभासु भाटसञ्ज्ञकैः सूतैः श्रीछत्रपतिशिवाजी-महाराजसभायां शाहीरसञ्ज्ञकैः कविभिश्च स्वीयकाव्यगायनेन कृतं योधानां युद्धप्रोत्साहनम् इतिहासज्ञानां सुपरिचितमेव विद्यते। एवमेव प्राचीनसूतैः कण्ठस्थीकृतस्य व्यासरचितस्य जयग्रन्थस्य राजसभासु गायनं नाश्चर्यकरं भवेत्। सूतमुखेषु दीर्घकालं स्थिते अलिखितेऽस्मिन्ग्रन्थे नानाविधपाठाः प्रक्षेपाश्च समुत्पन्नाः स्युः। भरतखण्डस्य भिन्नभिन्नस्थानेभ्यः समाहृतानाम् अनेकहस्तलिखितपुस्तकानां दीर्घपरिशीलनानन्तरं नानाविधपाठानां प्रक्षेपाणां च इदमेव कारणं महाभारतस्य संशोधितावृत्तिसंपादकैः डॉ सुखटणकर-महाशयैर्निर्दिष्टमस्ति।

अनया रीत्या विस्तृतस्य जयग्रन्थस्यैव भारतमिति सञ्ज्ञा प्रसिद्धा। अस्य भारतस्य श्लोकसङ्ख्याबोधक वचन महाभारते दृश्यते। तद्यथा—

चतुर्विंशतिसाहस्री चक्रे भारतसहिताम्।
उपाख्यानैर्विना तावत् भारत प्रोच्यते बुधै ॥ इति।

अस्मात् श्लोकात् ज्ञायते यत् महाभारतीयै उपाख्यानै रहितस्य ग्रन्थस्य भारतमिति सञ्ज्ञा वर्तते, तस्य च श्लोकसङ्ख्या चतुर्विंशतिसहस्रमिता अस्ति इति। दाशराज्ञसूक्तवत् जयग्रन्थे केवल युद्धवर्णनमासीत्। भारतग्रन्थे तु न केवल युद्धवर्णन किन्तु भरतकुलोत्पन्नाना कौरवपाण्डवाना तत्पूर्वजाना च केषाञ्चित् जन्मप्रभृति इतिहास, युद्धोत्तरकालिक पाण्डवानामितिहासश्च वर्णितो भवेत्। अस्य भारतग्रन्थस्य प्रारम्भ कस्मात्प्रकरणात् सञ्जात इत्यत्र यद्यपि स्पष्ट वचन नोपलभ्यते तथापि तदनुमानेन ज्ञातु शक्यते।

मन्वादि भारतं केचिदास्तिकादि तथापरे।
तथोपरिचरादन्ये विप्रा सम्यगधीयते॥

अस्मिन् श्लोके महाभारतस्य त्रीणि आरम्भस्थानानि निर्दिष्टानि सन्ति। मनुशब्द श्लोकवाचक अस्ति। 'नारायण नमस्कृत्य' इत्यादि श्लोक महाभारतारम्भे दृश्यते। तस्मिन् श्लोके जयग्रन्थस्य उल्लिखितत्वात् अयं श्लोक पूर्वं जयग्रन्थारम्भे स्यात्। पर तस्य मङ्गलरूपत्वात् स श्लोकस्तस्मात्स्थानादुद्धृत्य महाभारतारम्भे स्थापित इति अनुमातु शक्यते। भारतारम्भस्तु उपरिचराख्यानात् सभवति। इदमाख्यान महाभारते आदिपर्वणि ६३तमाद्ध्यायात्प्रारभ्यते। आदिपर्वारम्भे यथा महाभारतस्य स्तुतिपरा श्लोका विद्यन्ते तथैव अस्मादाख्यानात् पूर्वं ६२तमे अध्यायेऽपि सन्ति। अत कस्मिश्चित् काले तत्र ग्रन्थारम्भ स्यात् इति स्पष्ट भवति। इद भारतं व्यासशिष्येण वैशम्पायनेन परिक्षित्पुत्रस्य जनमेजयस्य सर्पसत्रे कथितमिति महाभारतात् ज्ञायते।

वैशम्पायनोक्तभारते उपाख्यानानि न सन्ति इति पूर्वोदाहृते 'चतुर्विंशतिसाहस्रीम्' इत्यादि श्लोके कथितमस्ति। महाभारते प्रविष्टानि 'नलदमयन्ती,' 'सत्यवत्सावित्री'प्रभृतीनि उपाख्यानानि यद्यपि भारते न भवेयु, तथापि भारतीयकथासबद्धानि 'दुष्यन्तशकुन्तला' 'ययाति—

प्रभृतीनामाख्यानानि भारतान्तर्गतान्येव भवेयु । ईदृशानि बहूनि आख्यानानि वैदिककाले एव निर्मितान्यासन् । तेषा पठन यज्ञकाले भवति स्म । उर्वशीपुरूरवसो यमयम्योश्च आख्यानबोधकसूक्ते ऋग्वेदे दृश्येते । अन्यानि सुपर्णाख्यानादीनि उपलभ्यन्ते च । तद्दर्शनेन तात्कालिकाख्यानस्वरूप तर्कयितुं शक्यते । वार्तिककारकात्यायनसमये एतादृशानि आख्यानानि प्रचलितान्यासन् । तदध्येतृणा तदध्यापकाना च तदाख्यानमूलकानि नामानि भवन्ति स्म । 'आख्यानाख्यायिकेतिहासपुराणेभ्यश्च' इति वार्तिक ( पाणिनिसूत्रम् ४, २, ६० ) विद्यते । भगवता पतञ्जलिना एतद्वार्त्तिकभाष्ये यवक्रीत-प्रियङ्गु-ययातिनामकानामाख्यानानामुल्लेख कृतोऽस्ति । यवक्रीताख्यान ययात्याख्यान च महाभारते क्रमेण वनपर्वणि ( अ १३५ १३८ ), आदिपर्वणि अ ७६-८५ च दृश्येते । पतञ्जलिसमये महाभारत साप्रतिकस्वरूपेणैव आसीत् इत्यत्र न सशय , किन्तु तस्मिन्काले एतेषामाख्यानानामध्ययन स्वतन्त्रतयापि भवति स्म, तदध्येतृणा 'यावक्रीतिक' 'यायातिक' इत्यादीनि विशिष्टनामानि च भवन्ति स्म इत्यपि अवश्यमुल्लेखनीयमस्ति ।

महाभारतस्य तृतीय संस्करणमुग्रश्रवा सूतपुत्रश्चकार । जनमेजयस्य सर्पसत्रे लोमहर्षणपुत्र उग्रश्रवा उपस्थित आसीत् । तत्र वैशम्पायनेन कथिता भारतकथा श्रुत्वा अनेकतीर्थदर्शन च कृत्वा स नैमिषारण्ये शौनकस्य द्वादशवार्षिके सत्रे आगत्य महाभारतकथा कथयामास, इति आदिपर्वणि प्रथमाध्याये वर्णितमस्ति । पूर्वोदाहृते 'मन्वादि भारत केचित्' इत्यादिश्लोके केषाञ्चिन्मतेन आस्तिकाख्यानात् भारतारम्भ कथितोऽस्ति । स आरम्भ अस्य महाभारतस्यैव स्यात् । महाभारतारम्भे ( आदिपर्वणि अ० १३-५८ ) आस्तिकाख्यानस्य विद्यमानत्वात् । इदमाख्यान वैदिकसुपर्णाख्यानस्य बहुलं सादृश्य धत्ते ।

अनेन तृतीयसस्करणेन महाभारतस्य विस्तर अतीव सञ्जात । अत एव साम्प्रत तस्य शतसाहस्रीसहितास्वरूप ( एकलक्षश्लोकात्मक ) दृश्यते । एतत्संस्करणसमये अनेकानि आख्यानानि, उपाख्यानानि, तीर्थवर्णनानि, राजधर्मादिप्रकरणानि, शिवविष्णुप्रभृतिपौराणिकदेवतास्तुतिकथा , तदात्वे

लोकसमति प्राप्तवत निवृत्तिमार्गस्य संन्यासधर्मस्य वा कथा, एवमादीनां तस्मिन् प्रविष्टत्वात् स ग्रन्थ सर्वसङ्ग्राहक सञ्जात। तथैव श्रीकृष्ण-चरित्रात्मक हरिवंशनामक परिशिष्ट च तत्र सयोजितम्।

महाभारतस्य प्रस्तुत स्वरूप व्यासानन्तर पञ्चाशद्वर्षान्तरे एव सिद्धम् इति साम्प्रदायिक मत वर्तते। पर तस्य ग्रन्थस्य महान्त विस्तर दृष्ट्वा, तस्य भाषा कथावर्णनादि च समीक्ष्य स ग्रन्थ शतश सवत्सरेभ्य ऊर्ध्वं प्रस्तुतस्वरूप प्राप्त इति भाति। महाभारतस्य प्रस्तुतरूपस्य उत्तरकाला-वधि अद्यापि अनिश्चित अस्ति, तथापि आश्वलायनगृह्यसूत्रे ‘सुमन्तुजैमि-निवैशम्पायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्या तृप्यन्तु’ इति तर्पणसूत्रस्य सत्त्वात् स अवधि. गृह्यसूत्रकालात् (ख्रिस्तपूर्वं पञ्चमषष्ठशताब्द्या) न अर्वाचीन इति तु निश्चितमेव। एतत्कालानन्तरमपि महाभारते कश्चिद्भाग प्रक्षिप्त स्यादिति अनुमीयते। केषुचित्स्थलेषु शकयवनपह्लवादि-परकीयाणा जनाना समुल्लेखस्य तत्र विद्यमानत्वात्। एतै परकीयै जनै कृतानि भारताक्रमणानि ख्रिस्तपूर्वचतुर्थशताब्द्या आरभ्य ख्रिस्तोत्तर प्रथम-द्वितीयशताब्दीपर्यन्त प्रचलितान्यासन्। अत तदुल्लेखवन्त श्लोका नातीव प्राचीना भवितुमर्हन्ति। तथापि एतादृशभाग अल्पतर एवास्ति।

जयग्रन्थसमयात् अद्ययावत् गतेषु सहस्रश संवत्सरेषु व्यासकृतमूलग्रन्थे यत्परिवर्तन सञ्जात तद्यथार्थतया ज्ञातु नैव शक्येत। किन्तु सौतिकृततृतीय-संस्करणकाले महाभारतस्य यत्स्वरूपमासीत् तदपि यथार्थतया ज्ञातु न शक्य-ते। अतीव विस्तृते अस्मिन्भरतखण्डे सूतमुखेषु दीर्घकालं स्थितत्वात्, अनेक-कविभि वारवार स्वीयरचनाना प्रक्षेपात्, अनेक लेखकाना लेखनप्रमादैश्च भिन्न-भिन्नदेशेषु उपलब्धेषु महाभारतपुस्तकेषु एतादृशमन्तरं दृश्यते यत् शतसाह-स्रीसहिताया मूलपुस्तकम् इदमेव इति निश्चिततया वक्तुम् आधुनिकसंशो-धनशास्त्र न प्रभवति इति भांडारकर–प्राच्यविद्या–संशोधन–मंडलद्वारा प्रका-श्यमानस्य महाभारत-संस्करणस्य प्रथमसम्पादकै डॉ. सुखटणकरमहाशयै प्रतिपादितमस्ति। आदिपर्वान्तर्गतपर्व-सङ्ग्रहपर्वणि या प्रतिपर्वश्लोकसख्या कथिता सा प्रमाणीक्रियेत चेत् तर्हि तस्या श्लोकसङ्ख्यायामपि गौडदाक्षिणा-त्यपाठभेदेन भिन्नत्व दृश्यते एव। अत उपलब्ध-हस्तलिखित-पुस्तकानि

